**<u>भूसंपादन आस्थापना - नाशिक</u>**

**आयुक्त, नाशिक विभाग यांच्या कार्यालयातील तसेच नाशिक विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि. ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८/अ-३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक- १० एप्रिल, २०२३.

**<u>वाचा-</u>** १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक संकीर्ण -२०१८/प्र.क्र.८/अ-३, दि.११.१०.२०२२.

२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३.

३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्र.भूसंआ/ मुवाढ/२०२३/प्र.क्र.३२/भूसं-१,दि.०९.०२.२०२३

**शासन निर्णय-**

विभागीय आयुक्त, नाशिक विभाग यांच्या कार्यालयातील एक नायब तहसीलदार व दोन अव्वल कारकून अशी ३ पदे तसेच नाशिक विभागातील विशेष भूसंपादन अधिकाऱ्यांच्या १६ पथकांतील १०३ पदे अशा एकूण १०६ पदांना दिनांक ११.१०.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०९.२०२२ ते दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता विभागीय आयुक्त, नाशिक यांच्या भूसंपादन आस्थापनेवरील सध्या कार्यरत एकूण ९३ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यंत खालील अटी - शर्तीवर मुदतवाढ देण्यात येत आहे-

अ) मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही व व्यपगत झालेले नाही.

ब) मुदतवाढ देण्यात येणाऱ्या अस्थायी पदांचा समावेश नाशिक विभागातील प्रस्तावित भूसंपादन पदांच्या आढाव्यामध्ये आहे.

२. वरील सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात येतील.

३. उपरोक्त सर्व पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

४. वरील सर्व पदांवर / पथकांवर होणारा खर्च आवश्यकतेनुसार मागणी क्र. सी-१-मुख्य लेखाशीर्ष २०२९ जमीन महसूल- (००) ००१ संचालन व प्रशासन - (०१) भूमी संपादन आस्थापना (योजनेतर) - (०१)(०२) आयुक्त, नाशिक -०१ वेतन (२०२९००६४) व (०२) भूमिसंपादन आस्थापना (योजनांतर्गत) - (०२) (०२) आयुक्त, नाशिक- ०१ वेतन (२०२९०२०६ ) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२३- २०२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व प्रत्यक्ष खर्च वर्षाअखेरीस संबंधित संपादक विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०४१०२००३३६३८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KEDARPRATAP JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56f8d, pseudonym=B44BFB88097D80ECCD982D439D4A688B06CD57C, serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2023.04.11 16:50:28 +05'30'

**( केदारप्रताप पाटील )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विभागीय आयुक्त,नाशिक विभाग, नाशिक
३) जिल्हाधिकारी, नाशिक,धुळे, जळगाव, अहमदनगर, नंदुरबार
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,धुळे,जळगाव,अहमदनगर,नंदुरबार
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) वित्त विभाग ( व्यय-९/ अर्थसंकल्प-३ व ४ / वित्तीय सुधारणा-१)
८) नियोजन विभाग
९) सार्वजनिक बांधकाम विभाग/ जलसंपदा विभाग / नगरविकास विभाग
१०) ब-१,ई-१,ई-३,अ-१, अ-२, अ-४ कार्यासने, महसूल व वन विभाग
११) निवड नस्ती.